दिनांक ०१ मे, २०२२ (महाराष्ट्र दिन) या दिवशी सामाजिक न्याय विभागाच्या योजनांची माहिती देणाऱ्या कार्यक्रमाचे आयोजन

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०२२/प्र.क्र.९५/बांधकामे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- २१ एप्रिल, २०२२

**प्रस्तावना** :-

दिनांक ०१ मे, २०२२ रोजी संपूर्ण महाराष्ट्रभर महाराष्ट्र दिन साजरा करण्यात येणार आहे. कोविड-१९ या महामारीमुळे मागील २ वर्षे संपूर्ण जग, देश आणि राज्य या महामारीला सामोरे गेले आणि जग, देशाबरोबरच आपल्या राज्यातही मोठ्या प्रमाणावर लॉकडाऊन झाला होता. मागील दोन वर्षांपासून आपण सर्व कोरोनाच्या निर्बंधांमध्ये होतो. आता ३१ मार्च, २०२२ रोजी पासून राज्य निर्बंधमुक्त झालेले आहे. या पार्श्वभूमीवर साजरा होणाऱ्या महाराष्ट्र दिनादिवशी खालीलप्रमाणे सामाजिक न्याय विभागाच्या योजनांची माहिती सर्वसामान्यांना मिळावी व त्याची व्याप्ती वाढावी, यासाठी छोटेखानी कार्यक्रमांचे आयोजन करण्याची बाब विचाराधीन होती. याबाबत आता खालीलप्रमाणे निर्णय घेण्याच्या सूचना देण्यात येत आहेत.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र दिन ०१ मे, २०२२ रोजी सामाजिक न्याय विभागाच्या योजनांची माहिती सर्वसामान्यांना मिळावी व त्याची व्याप्ती वाढावी, यासाठी खालीलप्रमाणे छोटेखानी कार्यक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

२. जिल्ह्यात शासनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात येतो त्याठिकाणी व राज्याचा मुख्य कार्यक्रम असतो तेथे सामाजिक न्याय विभागाचा स्टॉल उभारण्यात यावा.

३. सामाजिक न्याय विभागाच्या स्टॉलच्या मागे विभागाचे नाव दर्शविणारे बॅनर, ज्यावर शासनाच्या धोरणाप्रमाणे मा.मुख्यमंत्री, मा.उप मुख्यमंत्री, मा.मंत्री (सामाजिक न्याय) व मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय) महोदय यांची छायाचित्रे असावीत.

४. सामाजिक न्याय विभागांतर्गत कार्यान्वित असलेल्या योजनांची माहिती असणारे संक्षिप्त बॅनर कार्यक्रमाच्या ठिकाणी आवश्यक त्या परवानगीने लावण्यात यावे.

५. आयुक्त, समाज कल्याण, आयुक्त, दिव्यांग कल्याण, महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, (बार्टी), पुणे तसेच विभागांतर्गत कार्यरत सर्व महामंडळांचे महाव्यवस्थापक यांनी पत्रके छापून घ्यावीत आणि त्यांचे वाटप करण्यात यावे.

६. आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी विभागाच्या वतीने समाज कल्याण आयुक्तालय, दिव्यांग आयुक्तालय, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, (बार्टी), विभागांतर्गत कार्यरत महामंडळे या सर्वांची माहिती देणाऱ्या ४-fold माहितीपत्रकाची छपाई करावी व ही माहितीपत्रके सर्व ग्रामपंचायत, पंचायत समित्या, नगरपालिका, महानगरपालिका येथे वाटपासाठी पाठविण्यात यावीत. तसेच त्यादिवशी ग्रामीण भागात जेथे शासकीय झेंडावंदनाचा कार्यक्रम होतो, त्याठिकाणी ग्रामसेवक, विस्तार अधिकारी, मुख्य अधिकारी इत्यादि यांनी झेंडावंदनाच्या कार्यक्रमानंतर सामाजिक न्याय विभागाच्या योजनांचे संक्षिप्त वाचन करावे.

७. शासकीय कार्यक्रमात मा.पालकमंत्री यांचे हस्ते झेंडावंदनाचा कार्यक्रम होतो त्याठिकाणी मा.पालकमंत्री यांनी सामाजिक न्याय विभागाच्या ठळक योजनांचा उल्लेख त्यांचे भाषणात करावा. त्यासाठी आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी भाषणात घ्यावयाच्या योजनांची नावे/माहिती संक्षिप्त स्वरूपात मा. पालकमंत्री यांना उपलब्ध करावी.

८. या सर्व कामात आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) यांच्यामार्फत क्षेत्रीय स्तरावर उपलब्ध केलेले कर्मचारी/अधिकारी यांची मदत घ्यावी. त्यासाठी महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, (बार्टी), पुणे यांनाही सर्व सूचना द्याव्यात.

९. कार्यक्रमाच्या ठिकाणी लावण्यात येणाऱ्या बॅनरवर आणि माहितीपत्रकावर स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सवाचा लोगो छापण्यात यावा.

१०. या कामासाठी प्रति जिल्हा रू.१०,०००/- सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण व रू.१.४० लक्ष आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी) पुणे यांनी उपलब्ध करून द्यावेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०४२११३३८२६९२२२ असा आहे. हा आदेश डिजीटील स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशासनुसार व नावाने,

ANIL KONDAJI
AHIRE

Digitally signed by ANIL KONDAJI AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUCTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a47356798e6c9cf27e4353d60e51, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=FD9B93035F4DA174C04FA71634FE1F6AA493C78A5335F985651F937888DF7A89, cn=ANIL KONDAJI AHIRE
Date: 2022.04.21 16:28:54 +05'30'

**(अ.कों. अहिरे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सर्व विभागीय आयुक्त, महसुली विभाग
७) आयुक्त, समाजकल्याण, पुणे
८) आयुक्त, दिव्यांग कल्याण, पुणे
९) सर्व जिल्हाधिकारी
१०) महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण केंद्र, पुणे
११) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२) व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्गीय विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१३) व्यवस्थापकीय संचालक, साहित्यरत्न लोकशाहिर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१४) व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग आर्थिक विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
१६) व्यवस्थापकीय संचालक, लोकनेते गोपीनाथ मुंडे ऊसतोड कामगार महामंडळ, पुणे
१७) अध्यक्ष, सर्व जिल्हा जात पडताळणी समिती
१८) सर्व प्रादेशिक आयुक्त, समाजकल्याण
१९) सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण

२०) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद

२१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर

२२) निवासी लेखा परिक्षक, मुंबई/ अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२४) सर्व सह/ उपसचिव, अवर सचिव, कक्ष अधिकारी, सा.न्या. व वि.स. विभाग, मंत्रालय, मुंबई

२५) निवडनस्ती/बांधकामे